विदर्भ विकास कार्यक्रम २००९-१०
**डॉ.बाबासाहेब आंबेडकर कन्व्हेन्शन सेंटर, नागपूर येथील बांधकामानुषंगाने अट शिथील करणेबाबत-**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांकः सान्यावि -२०१७/प्र.क्र.६२/बांधकामे**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : २२.०८.२०१७.

वाचा :-

१. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच-२०११/ प्र.क्र.६१/ बांधकामे, दि.१४/०३/२०११.
२. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच-२०११/ प्र.क्र.६१/ बांधकामे, दि.११/०९/२०१४.
३. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच-२०१४/ प्र.क्र.६१/ बांधकामे, दि.१६/१२/२०१५.
४. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.सान्यावि-२०१७/ प्र.क्र.६२/ बांधकामे, दि.३१.०३.२०१७.
५. सभापती,नागपूर सुधार प्रन्यास यांचे पत्र अ.शा. पत्र क्र.५६०, दि.१८.०४.२०१७.
६. सभापती,नागपूर सुधार प्रन्यास यांचे पत्र क्र.का.अ.(प्र)/ ४९२, दि.०६.०५.२०१७.
७. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग पत्र क्र.बैठक-२०१७/ प्र.क्र. २७५ / बांधकामे, दि.०३.०८.२०१७.

प्रस्तावना :-

विदर्भ विकास कार्यक्रमांतर्गत २००९-१० अंतर्गत करावयाच्या कामांमध्ये, या विभागाच्या अखत्यारीतील डॉ.बाबासाहेब आंबेडकर कन्व्हेन्शन सेंटर, कामठी रोड, नागपूर या कामाचा समावेश करण्यात आला आहे.सदर कार्यक्रमामध्ये, नागपूर शहरात डॉ.बाबासाहेब आंबेडकर आंतरराष्ट्रीय केंद्र स्थापन करण्याचा प्रस्ताव आहे. सदर कामास संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये,रू.२२ कोटी इतके अनुदान वितरीत करण्यात आले आहे.सदर कामाच्या रू.११३.७४ कोटी इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास मा.मंत्रिमंडळाच्या दि. ०९.०९.२०१४ च्या बैठकीत मान्यता देण्यात आली. तद्‌नंतर संदर्भाधीन क्र. (०४) येथील दि.३१.०३.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये अटींच्या अधीन राहून रू.५१,८२,२६,०७०/- एवढा निधी वितरीत केला आहे. परंतु, दि.०४.०३.२०१७ रोजीच्या अधिसुचनेन्वये नागपूर सुधार प्रन्यास ऐवजी नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण आस्तित्वात आल्यामुळे महानगर क्षेत्राकरिता विकास संस्था म्हणून ना.सु.प्र. चे अधिकार संपुष्टात आले असल्याने प्रस्तुत कव्हेन्शन सेंटरचे परिरक्षण करणे शक्य होणार नसल्याचे ना.सु.प्र.ने त्यांच्या दि.१८.०४.२०१७ रोजीच्या पत्रान्वये कळविले आहे. तसेच डॉ. बाबासाहेब आंबेडकर कव्हेन्शन सेंटर नागपूर या कामानुषंगाने दि.२४.०७.२०१७ रोजीच्या बैठकीत झालेल्या निर्णयानुसार या विभागाच्या दि.३१.०३.२०१७ च्या शासन निर्णयातील अट क्र.०४- (देखभाल व परिरक्षणाची जबाबदारी नागपूर सुधार प्रन्यासची राहील) रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन शुध्दीपत्रक :-

सदरच्या शुध्दीपत्रकाद्वारे संदर्भाधीन क्र (०४) येथील शासन निर्णयात नमूद केलेली अट क्र.०४ (देखभाल व परिरक्षणाची जबाबदारी नागपूर सुधार प्रन्यासची राहील) रद्द करण्यात येत आहे.

२. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१७०८२३१६०५०२०३२२ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justic and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d81b5c910bad5837d7f88ac97a75b312f0e5744ecbdc45b7704dcb27f5d4dfef, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2017.08.23 15:55:37 +05'30'

**( अ.कों. आहिरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१ आयुक्त, समाजकल्याण, पुणे
२ सभापती,नागपूर सुधार प्रन्यास,नागपूर
३ महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा / लेखाअनुज्ञेयता ), मुंबई/नागपूर.
४ प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, नागपूर.
५ सहायक आयुक्त, समाजकल्याण, नागपूर.
६ जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
७ मा.मंत्री (सा.न्या.व वि.स.) यांचे खाजगी सचिव
८ मा.राज्यमंत्री (सा.न्या.व वि.स.) यांचे खाजगी सचिव
९ निवडनस्ती.